जलसंपदा विभागांतर्गत प्रकल्पाच्या संकल्पचित्रातील बदलामुळे होणारी वाढ तपासण्यासाठी/प्रमाणित करण्यासाठी शासन स्तरावर उच्चस्तरीय समिती गठीत करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. समिती -०९१९/प्र.क्र. ४२७/१९/मो.प्र.१
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३/०६/२०२०

**संदर्भ:-**

१) जलसंपदा विभाग, पत्र क्रमांक:- समिती -०९१९/प्र.क्र. ४२७/१९/मो.प्र.१, दि. २३/०९/२०१९.
२) जलसंपदा विभाग,पत्र क्रमांक:- समिती -०९१९/प्र.क्र. ४२७/१९/मो.प्र.१,दि. २२/११/२०१९ चे कार्यवृत्तांत.

**प्रस्तावना :**

जलसंपदा विभागांतर्गत प्रकल्पांना सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबतच्या कार्यपध्दतीचा आढावा घेऊन त्यामध्ये आवश्यक सुधारणा सुचविण्यासाठी समिती गठित करण्याबाबत मा. मुख्य सचिव यांची प्रधान सचिव, जलसंपदा यांच्या समवेत दि.२३/९/२०१९ रोजी बैठक संपन्न झाली. सदर बैठकीतील चर्चेच्या अनुषंगाने महासंचालक, प्राशिक्षण, संकलन, जलविज्ञान, संशोधन व सुरक्षितता नाशिक यांच्या अध्यक्षतेखाली संदर्भाकिंत क्र. १ अन्वये समिती गठीत करण्यात आली.

सदर समितीने केलेल्या शिफारशींवर विचारविमर्ष करण्यासाठी मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली दि. ०४/११/२०१९ रोजी बैठक संपन्न झाली. त्याबाबत संदर्भाकींत क्र. २ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या इतिवृत्तामधील निर्देशाच्या अनुषंगाने जलसंपदा विभागांतर्गत प्रकल्पाच्या संकल्पचित्रातील बदलामुळे होणारी वाढ तपासण्यासाठी/प्रमाणित करण्यासाठी शासन स्तरावर खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.त्याअनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे:-

**शासन निर्णय**

१) जलसंपदा विभागांतर्गत प्रकल्पाच्या संकल्पचित्रातील बदलामुळे होणारी वाढ तपासण्यासाठी/ प्रमाणित करण्यासाठी खालीलप्रमाणे उच्चस्तरीय समिती गठित करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पद | कार्यालयाचे नांव |
|---|---|---|
| १ | अध्यक्ष | सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय |
| २ | सह अध्यक्ष | महासंचालक, मेरी, नाशिक |
| ३ | सदस्य | मुख्य अभियंता (दवप्र) व स. स., जलसंपदा विभाग,मंत्रालय |
| ४ | सदस्य सचिव | प्रकल्पाशी संबंधित क्षेत्रीय मुख्य अभियंता |

**२) समितीची कार्यकक्षा पुढील प्रमाणे राहील :-**

i) प्रकल्पाच्या एखाद्या उपांगाच्या मूळ/सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीमध्ये संकल्पचित्रातील बदलामुळे जर १० % पेक्षा जास्त वाढ होत असेल तर असे बदल तांत्रिकदृष्टया आवश्यक आहेत किंवा कसे याची तपासणी करुन त्याबाबत प्रमाणित करणे.

ii) (समितीने संकल्पनातील बदल प्रमाणित केल्याखेरीज मुख्य अभियंता यांनी संकल्पचित्रास मान्यता देऊ नये. तसेच सुधारित संकल्पनाप्रमाणे बांधकाम करु नये.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२००६२३१६४१०८७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2020.06.23 16:48:12 +05'30'

**(अ.अ. कपोले)**
**मु.अ.(दवप्र) व सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
३. स्वीय सहायक, मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
५. स्वीय सहायक, सचिव (प्रकल्प समन्वय) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
६. स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई.
७. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे.
८. महासंचालक, मेरी, नाशिक
९. स्वीय सहायक, मु.अ. (द. व प्र.) व स.स. , जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
१०.सर्व स्वीय सहायक, मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
११.सर्व स्वीय सहायक, अधीक्षक अभियंता व उप सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. मोप्र-१ कार्यासन संग्रहार्थ.